**सन २०१६-१७ या वित्तीय वर्षासाठी महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांना डिसेंबर २०१६ ते मार्च २०१७ या कालावधीसाठी सहाय्यक अनुदान वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- केव्हीबी-२०१६/प्र.क्र.८९/उद्योग-६.**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०६ जानेवारी, २०१७.

वाचा : १) शासन निर्णय क्र.केव्हिबी -२०१६/ प्र.क्र. ८९/उद्योग- ६, दिनांक २७ एप्रिल, २०१६.
२) शासन निर्णय क्र.केव्हिबी-२०१६/प्र.क्र.८९/उद्योग-६, दिनांक २९ जून, २०१६.
३) शासन निर्णय क्र.केव्हिबी-२०१६/प्र.क्र.८९/उद्योग-६, दिनांक २० सप्टेंबर, २०१६.
४) लेखा व लेखापरिक्षण अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ,मुंबई यांचे क्र. कार्यासन-९/लेखा/१०६४१ व क्र.कार्यासन-९/लेखा /१०६४४ दिनांक २७/१२/२०१६ चे पत्र.
५) शासन परिपत्रक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. बीयुडी-२०१६/ २०१६-२०१७/ (२८) प्रशासन- १ , दिनांक ६ मे, २०१६.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त शासन निर्णय क्र. १ अन्वये महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांना सन २०१६-१७ साठी अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदींपैकी दिनांक १/४/२०१६ ते ३१/५/२०१६ या कालावधीकरीता ३१, सहायक अनुदान (वेतनेत्तर) या उदिष्टाखाली रूपये ३०,०००००/-( रूपये तीस लाख फक्त) व ३६, सहायक अनुदान (वेतन ) या उदिष्टाखाली रूपये ७,३८,१६,०००/- (सात कोटी अडतीस लाख सोळा हजार फक्त) वेतन व भत्ते यावरील खर्च भागविण्यासाठी सहायक अनुदान देण्यात आले होते. तसेच शासन निर्णय क्र. २ अन्वये माहे जून, २०१६ ते सप्टेंबर,२०१६ या कालावधीकरीता मंडळास ३१, सहायक अनुदान (वेतनेत्तर) या उदिष्टाखाली रूपये ६०,०००००/-( रूपये साठ लाख फक्त) व ३६, सहायक अनुदान (वेतन ) या उदिष्टाखाली रूपये १४,७६,३२०००/- (रूपये चौदा कोटी शहात्तर लाख बत्तीस हजार फक्त) वेतन व भत्ते यावरील खर्च भागविण्यासाठी सहायक अनुदान देण्यात आले होते. शासन निर्णय क्र. ३ अन्वये माहे ऑक्टोंबर, २०१६ ते नोव्हेंबर,२०१६ या कालावधीकरीता मंडळास ३१, सहायक अनुदान (वेतनेत्तर) या उदिष्टाखाली रूपये ३०,०००००/- ( रूपये तीस लाख फक्त) व ३६, सहायक अनुदान (वेतन ) या उदिष्टाखाली रूपये ७,३८,१६०००/- (रूपये सात कोटी अडतीस लाख सोळा हजार फक्त) वेतन व भत्ते यावरील खर्च भागविण्यासाठी सहायक अनुदान देण्यात आले होते. संदर्भ क्र.४ च्या पत्रान्वये मंडळाने उर्वरीत तरतुदीपैकी माहे डिसेंबर, २०१६ ते मार्च, २०१७ या कालावधीकरीता मंडळास वेत्तनेतर व वेतन व भत्ते यावरील खर्च भागविण्यासाठी मंडळास सहायक अनुदान उपलब्ध करून देण्याची विनंती केलेली आहे.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान), विधेयक, २०१६ महाराष्ट्र विधानमंडळाने मंजूर केले असून, सदर अधिनियम महाराष्ट्र अधिनियम क्र. १३ म्हणून महाराष्ट्र शासन, राजपत्र असाधारण भाग-४, दिनांक १६ एप्रिल, २०१६ मध्ये प्रसिध्द करण्यात आले असून मुख्य लेखाशिर्ष २८५१०५८५ खाली सन

२०१६-१७ या वित्तीय वर्षाकरिता अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदीपैकी उपलब्ध असलेल्या निधीमधून माहे डिसेंबर, २०१६ ते माहे मार्च , २०१७ या ४ महिन्यांच्या कालावधीतील वेतनेतर खर्च भागविण्यासाठी रूपये १,०३,१०००० /- (रूपये एक कोटी तीन लाख दहा हजार फक्त) व वेतन व भत्ते यावरील खर्च भागविण्यासाठी रूपये १४,७६,३६०००/-(रूपये चौदा कोटी शहात्तर लाख छत्तीस हजार फक्त) अशी एकूण रूपये १५,७९,४६०००/- ( रूपये पंधरा कोटी एकोणऐंशी लाख शहेचाळीस हजार फक्त ) इतके सहाय्यक अनुदान वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. यावरील खर्च मागणी क्रमांक के-७, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, १०५ खादी व ग्रामोद्योग (००) (०१) खादी व ग्रामोद्योग मंडळाला सहाय्यक अनुदान (दत्तमत) (२८५१ ०५८५) ३६, सहाय्यक अनुदान (वेतन) व ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) या उद्दिष्टांखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर रक्कमेच्या आहरण व संवितरणाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात आलेले आहेत. सदर अनुदान खर्च झाल्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र मंडळाने शासनास व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना विहित कालावधीत सादर करावे. तसेच लेख्यांच्या खर्चमेळाबाबत महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांच्याकडून विचारणा करण्यात येईल, तेव्हा लेख्यासंबंधीची आवश्यक ती कागदपत्रे मंडळाने महालेखापाल कार्यालयास सादर करावीत.

४. सदर शासन निर्णय, शासन परिपत्रक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. बीयुडी-२०१६/ २०१६-२०१७ /(२८) /प्रशासन-१, दिनांक ०६ मे, २०१६ मधील निर्देशानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१७०१०६११५९०७९११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vaishnav M N

Digitally signed by Vaishnav M N
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Endustries Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c2af1b03cee224a81b9f9c9cd2b1e6abe5e60e2c4801c2c6a3ba14985ec4fb8b, cn=Vaishnav M N
Date: 2017.01.17 16:27:26 +05'30'

**( म.न.वैष्णव )**
कक्ष अधिकारी

**प्रत :-**

१. विकास आयुक्त (उद्योग) उद्योग संचालनालय, मुंबई (५ प्रती )
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.
३. लेखा व लेखा परिक्षण अधिकारी , महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.

५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. वरिष्ठ उप महालेखापाल (पडताळणी) बाह्य लेखा परीक्षा विभाग, मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. लेखा अधिकारी, उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई.
१०. कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१६/अर्थसंकल्प-१४/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई-३२.
११. कार्यासन अधिकारी (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (उद्योग-६).